**महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी येथील मध्यवर्ती परिसरात विविध ठिकाणी सोलार वॉटर हिटर व सोलार हायमास्ट बसविण्याबाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय <u>मान्यता देणेबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : मफुवि-१४२४/प्र.क्र.६९/७-अे.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक : १५ मार्च, २०२४.

**संदर्भ :**१) संचालक (विस्तार शिक्षण व सासावि), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र क्र.मकृप/वि.शि.२/८७७/२०२४. दि.०७.०३.२०२४.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२), दि.२०.०९.२०१९.

३) सार्वजनिक बांधकाम विभाग,शासन निर्णय क्र.विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२ दि.१६.१२.२०१५.

४)उद्योग,उर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्र.अपाऊ-२०२०/प्र.क्र.१३७/ऊर्जा-७ दि.३१.१२.२०२०.

**<u>प्रस्तावना:-</u>**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मध्यवर्ती परिसरातील विविध वसतिगृहांमध्ये विदयार्थ्यांना दैनंदिन आवश्यक वापराकरीता सोलर वॉटर हिटर प्रणाली कार्यरत आहे. परंतु वसतिगृहातील विदयार्थ्यांच्या संख्येच्या तुलनेत सदरचे सोलार वॉटर हिटर कमी क्षमतेचे असून जूनी झाले आहेत. सदर जुन्या स्वरुपाच्या प्रणालीमध्ये बऱ्याचवेळा दुरुस्ती उद्भवते. या उपकरणांची वारंवार दुरुस्ती करण्यात येत असल्याने सदर उपकरणांची क्षमता कमी झाली आहे.

तसेच, विद्यापीठाच्या मध्यवर्ती परिसरात विदयुत पथदिवे असल्याने वीज देयक जादा येते. त्यामुळे विदयापीठाच्या महसुली उत्पन्नावर बोजा पडत आहे. यासर्व बाबींचा विचार करता, संचालक (विस्तार शिक्षण व सासावि), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी संदर्भ क्र.१ अन्वये राहुरी कृषि विदयापीठाच्या मध्यवर्ती परिसरातील विविध वसतिगृहांमध्ये सोलार वॉटर हिटर बसविण्याच्या तसेच, मध्यवर्ती परिसरातील ०८ विविध ठिकाणी सोलार हायमास्ट बसविण्याबाबतच्या एकूण रु.२६९.०० लाख रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांच्या कृषि परिषदेच्या ११४ व्या बैठकीमध्ये मान्यता देण्याच्या अधीन राहून, मा.मंत्री (कृषि) तथा अध्यक्ष, कृषि परिषद यांनी सदर कामाची निकड लक्षात घेता पूर्वमान्यता प्रदान केली आहे. तसेच, प्रस्तावास रु.२६९.२२ लाख निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी संदर्भ क्र.१ अन्वये केली आहे.

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मध्यवर्ती परिसरातील विविध वसतिगृहांवर सोलार वॉटर हिटर बसविण्याच्या प्रस्तावास तसेच, मध्यवर्ती परिसरातील ०८ विविध ठिकाणी सोलार हायमास्ट बसविणेबाबतच्या प्रस्तावास अधीक्षक अभियंता (विद्युत), मुंबई प्रादेशिक विद्युत मंडळ, मुंबई यांनी तांत्रिक सहमती दर्शवली आहे.

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.अपाऊ-२०२०/प्र.क्र.१३७/ऊर्जा-७ दि.३१.१२.२०२० अन्वये, राज्याचे नवीन व नवीकरणीय (अपारंपारिक) उर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीच्या पारेषण संलग्न प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण, २०२० व राज्याचे नवीन व नवीकरणीय (अपारंपारिक) उर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीच्या पारेषण विरहीत प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण, २०२० तयार केले आहे. सदर शासन निर्णयात नवीन व नवीकरणीय (अपारंपारिक) उर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीबाबत सर्वसाधारण सूचना दिलेल्या आहेत. सौर उष्णजल संयंत्रे व स्वयंपाकासाठी सौर ऊर्जेवर आधारित संयत्रे आस्थापित करणेबाबतच्या ही सूचना सदर शासन निर्णयात दिलेल्या आहेत. तसेच, शासकीय, निमशासकीय, स्थानिक स्वराज्य संस्था यांचे विश्रामगृह, वसतिगृहे, रुग्णालये, दवाखाने, कारागृहे व प्रशिक्षण केंद्र याठिकाणी सौर उर्जेवर आधारित संयंत्रे उभारण्याच्या सूचना सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या आहेत. त्यानुषंगाने, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मध्यवर्ती परिसरातील विविध वसतिगृहांमध्ये सोलार वॉटर हिटर व मध्यवर्ती परिसरातील ०८ विविध ठिकाणी सोलार हायमास्ट बसविण्याबाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मध्यवर्ती परिसरातील विविध वसतिगृहांमध्ये सोलार वॉटर हिटर व मध्यवर्ती परिसरातील ०८ विविध ठिकाणी सोलार हायमास्ट बसविणेबाबतच्या प्रस्तावास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **रक्कम (लाख)** |
|---|---|---|
| १. | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मध्यवर्ती परिसरातील विविध वसतिगृहांवर सोलार वॉटर हिटर बसविणे. (विश्वेश्वरय्या विद्यार्थी वसतिगृह, पदव्युत्तर विद्यार्थीनी वसतिगृह, आंतरराष्ट्रीय वसतिगृह व आचार्य वसतिगृह) (रु.२४.५७ + २३.३१+ २२.०६ लाख) | ६९.९४ |
| २. | महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी येथील मध्यवर्ती परिसरात विविध ठिकाणी सोलार हायमास्ट बसविणे. (विविध वसतिगृहे, प्रशासकीय इमारती, परीक्षा कक्ष, वाचनालय, जिमखाना,महाविद्यालये,सभागृह, अतिथीगृह, निवासस्थान परिसर इ.) (सोलार हायमास्ट बसविणे एकूण ८ कामे प्रत्येकी २४.९१) | १९९.२८ |
| | **एकूण रक्कम** | **२६९.२२** |

**२.** महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मध्यवर्ती परिसरातील विविध वसतिगृहांमध्ये सोलर वॉटर हिटर व मध्यवर्ती परिसरातील ०८ विविध ठिकाणी सोलार हायमास्ट बसविणेबाबतच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती</u>:-

१. सौर उष्ण जल/ स्वयंपाकासाठी सौरउर्जेवरील आधारित संयंत्राची उभारणी केंद्रशासनाचे नियम व नवीकरणीय उर्जा मंत्रालय आणि महाराष्ट्र उर्जा विकास अभिकरण (महाउर्जा) यांनी वेळोवेळी दिलेल्याविहीत तांत्रिक मोजमापे (Technical Specifications) व मानांकनानुसार करण्यात यावी. तसेच, यासंदर्भात उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.अपाऊ-२०२०/प्र.क्र.१३७/ऊर्जा-७, दि.३१.१२.२०२० च्या तरतुदींचे पालन करण्यात यावे.

२. सदरील काम शासनाचे विहित पध्दतीनुसार परवाना धारक शासकीय विद्युत ठेकेदाराकडूनच करुन घेण्यात यावे.

३. सदर कामासाठी वापरण्यात येणारे विद्युत साहित्य आय.एस. आय मार्कचे असावे.

४. वीज संचमांडणी उभारणी, प्रचलित केंद्रिय विद्युत प्राधिकरण विद्युत सुरक्षा विनियम २०१०, प्रचलित मानके, तसेच, सार्वजनिक बांधकाम (विद्युत) विभागाचे विनिर्देश यांतील तरतुदीनुसारच करण्यात यावी.

५. दरसुचीतील बाबींचे सार्वजनिक बांधकाम विद्युत विभागाकडून प्रसारित करण्यात आलेले विनिर्देश (Specifications) निविदेमध्ये समाविष्ट करणे बंधनकारक आहे.

६. सदर कामासाठी शासनाच्या इतर विभागाकडून आवश्यक प्रमाणपत्रे / ना- हरकत इ. पूर्तता करूनच पुढील कार्यवाही करावी.

७. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सर्व निविदा नियमावली व नियमांचे /प्रक्रियांचे अवलंबन / प्रचलित शासन निर्णयाचा - अवलंब करण्यांत यावा. तसेच, कोणत्याही परिस्थितीत कुठल्याही शासन नियम, अधिकाराचा भंग / अटीशर्तीचा भंग न करता पुढील कार्यवाही करणेची सर्वस्वी जबाबदारी कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

८. सदरील वीज संचमांडणीसाठी अर्थींग तपासूनच वीज संचमांडणी भारित करावी.

**३.** या बाबीसाठी येणारा खर्च, मागणी क्र.डी-३, कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१, पीकसंवर्धन, (२४१५ ००७२), ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान, या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१५१७४७४४१००१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.15 17:57:24 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
२. कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
३. कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
४. वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
६. विद्यापीठ अभियंता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.अहमदनगर.
१०.उपकोषागार अधिकारी, परभणी, जि.अहमदनगर.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी, २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१६.निवडनस्ती, कार्यासन-७ अे.